**दिनांक १ जानेवारी २००६ रोजी अथवा त्यानंतर सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळालेल्या / मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांची सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : वेतन ११०९ /प्र.क्र.४३ /सेवा-३**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९**

**वाचा:**- १) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक वेतन ११९९/प्र.क्र.२/सेवा-३,दिनांक २० जुलै, २००१
२)शासन निर्णय वित्त विभाग ,क्रमांक वेपूर -१२०९ /प्र.क्र.२७/सेवा-९,दिनांक २२ एप्रिल,२००९
३) शासन निर्णय वित्त विभाग क्रंमाक वेतन ११०९/प्र.क्र.२४/सेवा-३ दिनांक ९ जून,२००९

## शासन निर्णय

**प्रस्तावना** : शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर -१२०९/प्र.क्र.२७/सेवा-९, दिनांक २२ एप्रिल, २००९ अन्वये, दिनांक १ जानेवारी, २००६ पासून सुधारित वेतन संरचना लागू करण्याबाबत महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ विहित करण्यात आले आहेत. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वेपुर १२०९/प्र.क्र.२०/सेवा-९, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये स्वीकृत केलेल्या राज्य वेतन सुधारणा समिती, २००८ च्या शिफारशींनुसार दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी अथवा त्यानंतर सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळालेल्या / मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांची सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती करण्याबाबतचे आदेश दिनांक ९ जून, २००९ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले आहेत.

**निर्णय-**: शासन आता असा आदेश देत आहे दिनांक १ जानेवारी, २००६ रोजी अथवा त्यानंतर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः वेतन ११९९ /प्र.क्र.२/सेवा-३, दिनांक २० जुलै, २००१ मधील तरतुदींनुसार सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळालेल्या / मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांची सुधारित वेतन संरचनेत वेतन निश्चिती करण्याबाबतचे शासन निर्णय, क्रमांक वेतन ११०९/प्र.क्र.२४/सेवा-३, दिनांक ९ जून, २००९ अन्वये निर्गमित केलेले आदेश अधिक्रमित करून खालील प्रमाणे सुधारीत आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

२. दिनांक १ जानेवारी २००६ रोजी अथवा त्यानंतर सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळालेल्या/ मिळणा-या अधिकारी / कर्मचा-यांची सुधारित वेतन संरचनेत वेतननिश्चिती खालीलप्रमाणे करण्यात यावी :

(१) पदोन्नतीच्या संधी उपलब्ध असलेल्या कर्मचाऱ्यास योजनेचा लाभ मिळाल्यानंतर त्यास प्रत्यक्ष पदोन्नतीच्या पदाचा वेतन बँड मंजूर करण्यात यावा. या वेतन बँड मधील वेतन, संबंधित कर्मचाऱ्यास योजनेचा लाभ मिळण्यापूर्वी अनुज्ञेय असलेल्या वेतन बँड मधील वेतन अधिक ग्रेड वेतनावर ३ टक्के वेतनवाढ देऊन ( ही रक्कम दहाच्या पटीत नसल्यास ती दहाच्या पटीत घेऊन) निश्चित करण्यात यावे. योजनेच्या लाभानंतर वेतन बँड बदलत असलेल्या प्रकरणीही अशाच प्रकारे

वेतन निश्चिती करण्यात यावी. तथापि, वरीलप्रमाणे वेतनवाढ मिळवून वेतन बँड मध्ये निश्चित होणारे वेतन पदोन्नतीच्या पदाच्या वेतन बँड मधील किमान वेतनापेक्षा कमी असल्यास त्या वेतन बँड मधील किमान वेतन हे संबंधित कर्मचाऱ्याचे योजनेच्या लाभानंतरचे वेतन होईल.अशाप्रकारे वेतननिश्चिती करताना दिनांक १/१/२००६ पासून पदोन्नतीच्या पदाचे पूर्ण ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे. दिनांक १/०१/२००६ ते या आदेशाच्या दिनांकापर्यंत **काल्पनिकरित्या** पूर्ण ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे व त्याचा लाभ या आदेशाच्या दिनांकापासून देण्यात यावा. **मात्र या सुधारणेच्या परिणामस्वरुप दिनांक १/०१/२००६ ते या आदेशाचा दिनांक या दरम्यानच्या कालावधीतील थकबाकी अनुज्ञेय असणार नाही.**

(२) पदोन्नतीची संधी उपलब्ध नसलेल्या अथवा एकाकी पदावरील कर्मचाऱ्यास दिनांक १ जानेवारी २००६ रोजी अथवा त्यानंतर योजनेचा लाभ मिळाल्यानंतरचे वेतन, विद्यमान वेतन बँड मधील वेतन व ग्रेड वेतनावर ३ टक्के वेतनवाढ देऊन (ही रक्कम दहाच्या पटीत नसल्यास ती दहाच्या पटीत घेऊन) विद्यमान वेतन बँडमध्येच निश्चित करण्यात यावे. त्याच्या विद्यमान वेतन बँड मध्ये योजनेच्या लाभांनंतरही बदल होणार नाही. त्याशिवाय कर्मचाऱ्यास त्याच्या पदाचे विद्यमान ग्रेड वेतन अधिक खाली नमूद केल्याप्रमाणे समुचित ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे :-

| मूळ पदाचे ग्रेड वेतन (रुपये) | मूळ पदाच्या ग्रेड वेतनाव्यतिरिक्त अनुज्ञेय ग्रेड वेतन (रुपये) |
|---|---|
| २००० पर्यंत | २०० |
| २००० पेक्षा जास्त व ४००० पेक्षा कमी | ३०० |
| ४००० पेक्षा जास्त व ५००० पेक्षा कमी | ४०० |
| ५००० पेक्षा जास्त | ५०० |

३. वरील प्रमाणे योजनेचा लाभ मिळालेल्या शासकीय कर्मचाऱ्यास योजनेच्या लाभाच्या दिनांकापासून अथवा त्याच्या पुढील वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतन निश्चिती करण्याचा विकल्प देता येईल. अशा प्रकरणी, वेतन निश्चिती व पुढील वेतनवाढ खालील प्रमाणे अनुज्ञेय करण्यात यावी :-

(अ) पुढील वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतन निश्चिती करण्याचा विकल्प दिलेल्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत योजनेच्या लाभाच्या दिनांकास त्याच्या वेतन बँडमध्ये बदल होणार नाही. मात्र, त्यास यथास्थिती वरील (१) अथवा (२) प्रमाणे अनुज्ञेय ग्रेड वेतन मंजूर करण्यात यावे. त्यानंतर पुढील वेतनवाढीच्या दिनांकास त्याची पुनर्वेतननिश्चिती करण्यात यावी. त्या दिवशी त्यास प्रथम वार्षिक वेतनवाढ आणि दुसरी पदोन्नतीची वेतनवाढ अशा दोन वेतनवाढी देण्यात याव्यात. या वेतनवाढी परिगणित करताना योजनेच्या लाभापूर्वी मिळत असलेले मूळ वेतन (वेतन बँड मधील वेतन + ग्रेड वेतन) विचारात घेण्यात यावे.

(ब) योजनेच्या लाभाच्या दिनांकापासून वेतन निश्चिती करण्याचा विकल्प दिलेल्या अथवा तसे समजण्यात आलेल्या शासकीय कर्मचाऱ्याच्या बाबतीत, त्याला २ जुलै ते १ जानेवारी या कालावधीत योजनेचा लाभ मिळाला असल्यास

त्यास पुढील वेतनवाढ पुढील १ जुलै रोजी देण्यात यावी. परंतु, त्याला संबंधित वर्षाच्या २ जानेवारी ते ३० जून दरम्यान योजनेचा लाभ मिळाला असल्यास त्यास पुढील वर्षाच्या १ जुलै रोजी वेतनवाढ मिळेल.

४. दि.०१.०१.२००६ पुर्वी सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ अनुज्ञेय करण्यात आला असेल त्यांना या आदेशातील परिच्छेद २ (१) मधील पूर्ण ग्रेड वेतनाची तरतूद लागू राहील.

५. सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्याबाबतच्या कार्यालयीन आदेशाचा नमुना प्रपत्र -१ येथे दिला आहे.सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मिळण्याबाबतचा विकल्प देण्याचा नमुना प्रपत्र २ येथे देण्यात आला आहे

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २००९०८३११८५११०००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(श.ग.सातपूते)**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय
# प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
# प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
# सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचियालय, मुंबई.
# प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
#आयुक्त, राज्य माहिती आयोग, (सर्व)
# सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
#प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मंबई.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषदा
महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड. पुणे
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
सिनियर रिसर्च ऑफीसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर.
जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.
मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका
कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर
कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर
कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला
कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी
कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, पुणे विद्यापीठ, पुणे
कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर
कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती
कुलसचिव, श्रीमती नाथाबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई
कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-३)

------

# पत्राद्वारे

(शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वेतन ११०९ /प्र.क्र. ४३/०९ /सेवा-३, दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९ सोबतचे प्रपत्र)

# प्रपत्र - १

*(सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ अनुज्ञेय करण्यासाठी कार्यालयीन आदेशाचा नमुना )*

## कार्यालयीन आदेश

क्रमांक :

*कार्यालयाचे नांव* -------------------

-----------------------------------

-----------------------------------

श्री/श्रीमती/कुमारी ------------------------------------ पदनाम ----------------------- सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ दिनांक / / पासून अनुज्ञेय करण्यात येत आहे.

या अनुषंगाने त्यांची वेतननिश्चिती वेतन ११०९ /प्र.क्र.४३/०९ /सेवा-३, दिनांक मधील परिच्छेद २(१) / २(२) ( लागू होत नसेल ते खोडावे ) नुसार व परिच्छेद ३ विचारात घेऊन करण्यात येईल. त्यासाठी वेतननिश्चितीचा विकल्प प्रपत्र २ प्रमाणे हे कार्यालयीन आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत देण्यात यावा.

*सही/ -*

*नाव व पदनाम*

(शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक :वेतन ११०९ /प्र.क्र. ४३/०९ /सेवा-३, दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९ सोबतचे प्रपत्र)

**प्रपत्र-२**

**नांव -----------------------**
**पदनाम -------------------**
**कार्यालय ------------------**

प्रति,
अधिका-यांचे पदनाम
कार्यालयाचा पत्ता
विभाग

विषय-: वेतन निश्चितीचा विकल्प देणेबाबत
संदर्भ-: कार्यालयीन आदेश क्र दिनांक

महोदय,

मला दिनांक पासून सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजने नुसार वरीष्ठ वेतन श्रेणीचा लाभ अनुज्ञेय होत असून वरीष्ठ वेतन श्रेणीतील वेतन निश्चिती खालील प्रमाणे करण्यात यावी असा विकल्प देत आहे.(दोन प्रतीत)

१) सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेनुसार वरीष्ठ वेतन श्रेणी मंजूर करण्यात आल्याच्या दिनांकास
२) सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेनुसार वरीष्ठ वेतनश्रेणी अनुज्ञेय झाल्यानंतर येणा-या वेतनवाढीचे दिनांकास म्हणजे १ जुलै पासून

दिनांक

सही

**नाव व पदनाम**

(टिप:- वरील क्र १ किंवा २ यापैकी अनावश्यक मजकूर खोडून टाकावा व तेथे स्वाक्षरी करावी)